**साथीचे रोग टाळण्यासाठी करावयाच्या**
**प्रतिबंधात्मक उपाय योजना......**

**महाराष्ट्र शासन,**
**नगर विकास विभाग**

शासन परिपत्रक क्रमांक :- जीईएन-१०/४२४/प्र.क्र. १११/२०००/नवि-२७,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३१ मे, २०००.

**संदर्भ :-** १) शासन परिपत्रक क्रमांक :-जीईएन-१०९८/३५६/प्र.क्र.१२०/९८ /नवि-२७, दिनांक १९ जून, ९८
२) शासन परिपत्रक क्र. जीईएन-१०९८/३५६/प्र.क्र.१२०/९८ /नवि-२७, दिनांक ६ ऑगस्ट, ९८
३) शासन परिपत्रक क्र. जीईएन-१०९८/३५६/प्र.क्र.१२०/९८ /नवि-२७, दिनांक ४ जून, ९९
४) शासन परिपत्रक क्र. जीईएन-१०९८/३५६/प्र.क्र.१२०/९८ /नवि-२७, दिनांक २९ जानेवारी, २०००

## परिपत्रक

राज्यातील नगरपरिषदा व महानगरपालिका क्षेत्रात गॅस्ट्रो, कॉलरा, अतिसार, काविळ, विषमज्वर रोगाच्या प्रसारास अद्याप आळा बसलेला नाही, असे दिसून आले आहे. तसेच मुंबई, कोल्हापूर, नागपूर, कल्याण महानगरपा--लिका क्षेत्रात काविळ लागण मृत्यूचे प्रमाण जास्त असल्याचे दिसून येत आहे. महानगरपालिका व नगरपालिका क्षेत्रात दुषित पाणी, परिसर स्वच्छतेचा अभाव, उघडयावरील खाण्याच्या सवयी, यामुळे शहरी भागात साथरोग प्रादुर्भाव वाढत असल्याचे दिसून येते. त्याचे मुख्य कारण अशुध्द पाणी पुरवठा हे आहे. नगरपरिषदा व महानगरपालिकांनी त्यांच्या क्षेत्रातील नागरीकांना शुध्द व स्वच्छ पिण्याच्या पाण्याचा पुरवठा होईल, याकडे विशेष लक्ष पुरविणे आवश्यक आहे. या संदर्भात वर नमूद केलेल्या परिपत्रकान्वये नगरपरिषदा व महानगरपालिकांना वेळोवेळी कळविण्यात आले आहे. तरी अजूनही याबाबतीत विशेष लक्ष देऊन, जबाबदारीने अंमलबजावणी करणे आवश्यक आहे.

०२. या परिपत्रकान्वये राज्यातील सर्व नगरपरिषदा व महानगरपालिका यांना पुन्हा कळविण्यात येते की, त्यांनी त्यांच्या क्षेत्रामध्ये साथीचे रोग टाळण्यासाठी

१) पाण्याचे दैनंदिन शुध्दीकरण करूनच पाणीपुरवठा करण्यात यावा
२) नळ व व्हाल गळत्यांच्या दैनंदिन शोध व दुरूस्ती करणे
३) गटारांची दैनंदिन स्वच्छता करून ती वाहती ठेवणे

४) केरकचरा दैनंदिन उचलून परिसरात स्वच्छता राखणे
५) ब्लिचिंग पावडर, क्लोरीनचा पुरेसा साठा कायम ठेवणे
६) पाणीपुरवठा तपासणी, ओ. टी. टेस्टद्वारे नियमितपणे पाण्याची गुणवत्ता पहाणे व त्यानुसार त्वरीत कार्यवाही करणे
७) शहरातील बकाल वस्तीमध्ये स्वच्छता, रूग्ण सर्वेक्षण याकडे विशेष लक्ष देणे
८) पाण्याच्या स्त्रोता भोवतालच्या स्वच्छतेची काळजी घेणे

०३. नागरी क्षेत्रामध्ये स्वच्छ व शुध्द पाण्याचा पुरवठा करणे, पिण्याच्या पाण्याचे साठे दूषित पाण्याने अशुध्द होणार नाहीत, याची काळजी घेणे, साथीच्या रोगावर प्रतिबंधात्मक उपाय योजना करणे व साथ पसरल्यास त्यावर नियंत्रण करणे, ही सर्व नगरपरिषदा व महानगरपालिकांची जबाबदारी असून या प्रकरणी जे अधिकारी/कर्मचारी दुर्लक्ष करतील त्यांच्याविरूध्द गंभीर कार्यवाही करण्यात येईल.

सदर सूचना व उपाय योजना यांचे नगरपरिषदा/महानगरपालिकांनी काटेकोरपणे पालन करावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(पां. वि. घाडगे)
महाराष्ट्र शासनाचे उप सचिव

प्रति,
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी/सर्व महानगरपालिका आयुक्त
संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई
त्यांना कळविण्यात येते की, सदरहू परिपत्रक सर्व नगरपरिषदांना कळविण्यांत यावे.
सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व कार्यासन अधिकारी, नगर विकास विभाग
निवड नस्ती (नवि-२७)